**सहायक नगर रचनाकार (पदवीधारक/पदविकाधारक) संवर्गातील अधिकाऱ्यांना नगर रचनाकार (पदवीधारक/ पदविकाधारक) पदावर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्र. पदोन्न-१३२२/प्र.क्र.११९/२०२२/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ जून, २०२३.

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६.
२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील नगर रचनाकार (पदवीधारक/ पदविकाधारक) (गट-अ/राजपत्रित) (एस-२० : रु.५६,१००-१,७७,५००) या संवर्गातील रिक्त पदे निम्न संवर्गातील सहायक नगर रचनाकार (पदवीधारक/पदविकाधारक) (गट-ब/राजपत्रित) (एस-१५ : रु.४१,८००-१,३२,३००) या संवर्गातून तदर्थ पदोन्नतीने भरण्यासाठी विभागीय पदोन्नती समितीची बैठक दि. दि.२५.०८.२०२२ रोजी घेण्यात आली होती. त्यानुसार विभागीय पदोन्नती समितीने शिफारस केल्यानुसार सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यासाठी पात्र ठरविलेल्या अधिकाऱ्यांच्या सन २०२१-२०२२ च्या तदर्थ निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिली असून सदर अधिकाऱ्यांना पदोन्नती व पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने आता पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

**शासन आदेश :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील खालील तक्यात दर्शविण्यात आलेल्या सहायक नगर रचनाकार (पदवीधारक/पदविकाधारक) (गट-ब/राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांना **नगर रचनाकार (पदवीधारक/पदविकाधारक)** (गट-अ/ राजपत्रित) (एस-२० : रु.५६,१००-१,७७,५००) या पदावर खालील अटींच्या अधीन राहून **तदर्थ** स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक २०२२ ची तात्पुरती ज्ये.सू. | अधिकाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ३६ | श्रीमती निकिता कल्याणराव भांगे | भ.ज.(ड) |
| २ | ४८ | श्री.सतिश मच्छिंद्रनाथ साळुंके | खुला |
| ३ | ३७ | श्री.सतिश विठ्ठल चव्हाण | इ.मा.व. |
| ४ | ४९ | श्री.गुलाबराव हंबीरराव झांबरे | खुला |
| ५ | ३८ | श्री.आशिष शेषराव वानखेडे | अ.जा. |
| ६ | ५० | श्री.योगेशकुमार रमाकांत पवार | अ.जा. |
| ७ | ३९ | श्रीमती श्वेता अमित दारुणकर | वि.मा.प्र. |
| ८ | ५१ | श्री.आनंदा राजाराम कांबळे | अ.जा. |
| ९ | ४० | श्रीमती नम्रता मुधकरराव बोबडे | इ.मा.व. |
| १० | ४१ | श्री.प्रशांत शामराव भोसले | भ.ज.(ब) |
| ११ | ५३ | श्री.रमेश आसराजी पाटील | खुला |

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक २०२२ ची तात्पुरती ज्ये.सू. | अधिकाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १२ | ४२ | श्रीमती भाग्यश्री नरेंद्र बोरकर | अ.जा. |
| १३ | ५४ | श्री.रमेशकुमार काशिनाथ आवताडे | खुला |
| १४ | ४३ | श्री.अक्षय जगदसिंग ठेंग | वि.जा.(अ) |
| १५ | ५५ | श्री.सुनिल पांडुरंगजी खांडेकर | अ.जा. |

**अटी व शर्ती -:**

I. निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

II. मा.सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून सदर पदोन्नती तदर्थ स्वरुपात देण्यात येत आहे.

III. रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

IV. दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.२२.०७२०२१ रोजीच्या निर्णयानुसार दिव्यांग आरक्षणासह पदोन्नतीसाठीची सर्व रिक्त पदे सा.प्र.वि./१६-अ यांनी दि.०५.०७.२०२१ रोजीचा शासन निर्णय व दि.२३.०७.२०२१ च्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

V. सरळसेवेच्या कोटयात रिक्त झालेल्या पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती ही पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिने किंवा म.लो.आ. शिफारस प्राप्त उमेदवारांची नियुक्ती होईपर्यंत किंवा तदर्थ पदोन्नत अधिकाऱ्यांची नियमित पदावर पदोन्नती होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल व आवश्यकता असल्यास दर ११ महिन्यानंतर खंडीत करुन पुढे चालू ठेवली जाईल.

VI. सदर पदोन्नती ही तदर्थ स्वरुपात असल्याने, संबंधित पदावर अधिकाऱ्याचा धारणाधिकार राहणार नाही.

VII. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणात ज्येष्ठतासूचीसंदर्भात प्रलंबित असलेल्या प्रकरणातील अंतिम निर्णयास अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

VIII. सदर पदोन्नती ही तदर्थ स्वरुपातील असल्याने, या आदेशान्वये पदोन्नत अधिकाऱ्यांना सेवाज्येष्ठतेचे लाभ अनुज्ञेय नाहीत.

IX. या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांविरुद्ध सद्य:स्थितीत कोणतीही विभागीय चौकशी/न्यायालयीन कारवाई प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही, या अटीच्या अधिनतेने सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

X. ज्येष्ठतासूचीनुसार विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांची पात्रापात्रता तपासण्यात आली असून या संदर्भात भविष्यात कोणतेही प्रकरण उद्धवल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने यथायोग्य निर्णय घेण्यात येईल.

XI. जात पडताळणी कार्यालय यांच्याकडून प्राप्त जात पडताळणी प्रमाणपत्रासंबंधी भविष्यात कोणत्याही स्तरावर तफावत आढळून आल्यास संबंधित मागासवर्गीय अधिकाऱ्याची पदोन्नती रद्द करुन आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

XII. पदोन्नती देण्यात येत असलेले अधिकारी सामान्य प्रशासन विभाग, दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळवून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आल्याचे

दिसून येत नाही. तथापि, सदर मागासवर्गीय अधिकाऱ्यांबाबत भविष्यात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संचालनालयाची राहील.

XIII. सदर पदोन्नती तदर्थ स्वरुपाची असल्याने या तदर्थ पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही .

XIV. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०२.०६.२०१४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार संबंधीत अधिकाऱ्यांनी पदोन्नतीपूर्वी मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर करणे बंधनकारक राहील .

XV. उपरोक्त नमूद अटींशिवाय उक्त अधिकाऱ्यांची पदोन्नती त्यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षाच्या पुढे किंवा अर्हताकारी ३० वर्षाच्या सेवा कालावधीपुढे सेवेत राहण्यास पात्रापात्रता आजमाविण्याच्या निर्णयाच्या अधीन राहील.

XVI. निवडसूचीस मान्यता देतेवेळी सामान्य प्रशासन विभागाने घातलेल्या अटींच्या अधिनतेने सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

**०२.** खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार नगर रचनाकार (गट-अ/राजपत्रित) (पदवीधारक/ पदविकाधारक) पदावरील तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदोन्नतीने पदस्थापना केलेले कार्यालय |
|---|---|---|
| *१* | *२* | *३* |
| १ | श्रीमती निकिता कल्याणराव भांगे | **नगर रचनाकार, लातूर महानगरपालिका (प्र.नि.)** या रिक्त पदावर. |
| २ | श्री.सतिश मच्छिंद्रनाथ साळुंके | **नगर रचनाकार, वर्ग-१, मुल्यांकन तज्ञ, जळगांव/धुळे पथक, जिल्हाधिकारी जळगाव, जि.जळगाव** या रिक्त पदावर. |
| ३ | श्री.सतिश विठ्ठल चव्हाण | **सहायक संचालक, नगर रचना, मुल्यांकन, नाशिक** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर. |
| ४ | श्री.गुलाबराव हंबीरराव झांबरे | **कोल्हापूर नागरी क्षेत्र विकास प्राधिकरण, जि.कोल्हापूर** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर. |
| ५ | श्री.आशिष शेषराव वानखेडे | **नगर रचनाकार, अकोला महानगरपालिका (प्र.नि.)** या रिक्त पदावर. |
| ६ | श्री.योगेशकुमार रमाकांत पवार | **उप संचालक, नगर रचना, बृहन्मुंबई** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर. |
| ७ | श्रीमती श्वेता अमित दारुणकर | **भूमि संपादन विशेष अधिकारी, (१५) पुणे** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर. |
| ८ | श्री.आनंदा राजाराम कांबळे | **संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर. |
| ९ | श्रीमती नम्रता मुधकरराव बोबडे | **नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (प्र.नि.)** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर. |
| १० | श्री.प्रशांत शामराव भोसले | **नगर रचनाकार, इचलकरंजी महानगरपालिका, इचलकरंजी (प्र.नि.)** या रिक्त पदावर. |
| ११ | श्री.रमेश आसराजी पाटील | **झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने. |
| १२ | श्रीमती भाग्यश्री नरेंद्र बोरकर | **नगर रचनाकार, वर्धा नगरपरिषद, वर्धा (प्र.नि.)** या रिक्त पदावर. |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदोन्नतीने पदस्थापना केलेले कार्यालय |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १३ | श्री.रमेशकुमार काशिनाथ आवताडे | **नगर रचनाकार, बारामती नगरपरिषद, बारामती (प्र.नि.)** या रिक्त पदावर. |
| १४ | श्री.अक्षय जगदसिंग ठेंग | **छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर (प्र.नि.)** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर. |
| १५ | श्री.सुनिल पांडुरंगजी खांडेकर | **सहायक संचालक, नगर रचना, सिंधुदुर्ग शाखा** या कार्यालयातील नगर रचनाकार या रिक्त पदावर. |

**०३.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे आदेश प्राप्त होताच पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होणे आवश्यक आहे.

**०४.** उक्त अधिकाऱ्यांपैकी ज्या अधिकाऱ्यांची पदस्थापना प्रतिनियुक्तीच्या पदावर करण्यात आली आहे. त्यांना प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती लागू राहतील.

**०५.** या आदेशान्वये पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांचा पदस्थापना केलेल्या पदावर रुजू झाल्याचा अहवाल संबंधित कार्यालय / संचालक, नगर रचना, पुणे यांनी nitin.shelke@nic.in या ई-मेल पत्त्यावर तात्काळ सादर करावा.

**०६.** पदोन्नत अधिकारी हे पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास किंवा पदोन्नती न स्वीकारल्यास, त्यांना पदोन्नती नको आहे, असे समजून सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.३०३/ का.१२, दि.१२.०९.२०१६ मधील त्यांचे नांव निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल. तसेच यानंतर पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये संबंधित अधिकाऱ्यांची पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येणार नाही. तद्नंतर गुणवत्तेप्रमाणे संबंधित अधिकारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्याचा नियमित निवडसूचीत समावेश करण्याबाबत त्यांच्या नांवाचा विचार करण्यात येईल. तसेच अशा अधिकाऱ्यास कालबद्ध पदोन्नती / सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना / सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा पहिला / दुसरा लाभ मंजूर करण्यात आला असल्यास, वित्त विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र.आप्रयो-१०१५/प्र.क्र.१११/२०१५/सेवा-३, दि.२३ डिसेंबर, २०१५ मधील तरतुदीनुसार सदरचा लाभ काढून घेण्यात येईल. मात्र दिलेल्या लाभाची वसुली करण्यात येणार नाही.

**०७.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदग्रहण केल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प न दिल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ (१) (ए) व महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम १३ (अ) (१) (२) (ब) (१ व २) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन त्यांची वेतननिश्चिती करण्यात यावी.

**०८.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांना पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी ज्या दिनांकास हजर होण्यास कळविण्यात आले आहे व ते नियुक्तीच्या ठिकाणी ज्या दिनांकास हजर होतील, याबाबत शासनास तातडीने अवगत करण्यात यावे.

**०९.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास किंवा राजकीय दबाव आणून नियुक्ती अन्य ठिकाणी करण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्यानुसार नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाची कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चा भंग करणारी असल्याने संबंधित अधिकाऱ्याविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, यांची नोंद घेण्यात यावी.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६२६१५१६३८१७२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2023.06.26 16:42:54 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति :-**

सर्व संबंधित अधिकारी यांना संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत.

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१.मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१२. मा.अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. मा.प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकारण, नागपूर.
१६. महानगर आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकारण, छत्रपती संभाजीनगर.
१७. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
१८. आयुक्त, महानगरपालिका, लातूर/अकोला/इचलकरंजी.
१९. जिल्हाधिकारी, जळगाव/अकोला.
२०. मुख्य कार्यकारी अधिकारी, कोल्हापूर नागरी क्षेत्र विकास प्राधिकरण, कोल्हापूर.
२१. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई.
२२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर.
२३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
२४. संचालक, नगर रचना तथा सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. सर्व सह संचालक, नगर रचना.
२६. उप संचालक, नगर रचना तथा पदसिध्द उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. उप संचालक, नगर रचना, बृहन्मुंबई.
२८. सहायक संचालक, नगर रचना, मुल्यांकन, नाशिक/सिंधुदूर्ग शाखा/नाशिक शाखा/अकोला शाखा/ यवतमाळ शाखा/गडचिरोली शाखा/पालघर शाखा/बारामती शाखा/रत्नागिरी शाखा.

२९. मुख्याधिकारी, नगर परिषद, वर्धा/बारामती.
३०. सह जिल्हा निबंधक, वर्ग-१, नाशिक/कोल्हापूर.
३१. उप अभियंता, अंमलबजावणी कक्ष, नगर रचना, कोकण विभाग, नवी मुंबई.
३२. भूमी संपादन विशेष अधिकारी (१५), पुणे.
३३. नगर रचनाकार, वर्ग-१, मुल्यांकन तज्ञ, जळगांव/धुळे पथक, जिल्हाधिकारी जळगाव, जि.जळगाव.
३४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर.
३६. सर्व कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, ------------------.
३८. निवडनस्ती / नवि-२७.

*****